**श्री. प्रशांत मनोहर भांडारकर, कार्यकारी अभियंता (स्थापत्य) यांना अधिक्षक अभियंता (स्थापत्य) या पदावरील पदोन्नतीस शासन मान्यता देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**नगर विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांक:- नासुप्र - १६२५/ प्र.क्र.३९/नवि-२६**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
४ था मजला, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक:- २० मार्च, २०२५.

**संदर्भ :-** (१) सभापती, नागपूर सुधार प्रन्यास, नागपूर यांचे पत्र साप्रवि/आ.वि./पदोन्नती/२०४९, दि. १४.०२.२०२५
(२) नागपूर सुधार प्रन्यास प्रशासकीय ठराव क्र.२/१२२४ दि. १०.०२.२०२५
(३) शासन पत्र क्र. नासुप्र-२०१६/प्र.क्र.१११/नवि-२६, दि.०१.०४.२०१९

**प्रस्तावना :-**

नागपूर सुधार प्रन्यासद्वारे मान्यता प्रदान करण्यात आलेल्या संदर्भ क्र. ३ येथील पत्रान्वये मंजूर सेवाप्रवेश भरती पदोन्नती नियमामध्ये अधिक्षक अभियंता पदाचा समावेश असून त्यानुसार अधिक्षक अभियंता पदावर पदोन्नतीकरिता शासनाची पूर्वमान्यता आवश्यक आहे.

२. मा. सर्वोच्च न्यायालयाच्या याचिका क्र.२८३०६/२०१७ मधील अंतिम निर्णयाच्या अधिन राहून श्री. प्रशांत मनोहर भांडारकर यांची अधिक्षक अभियंता (स्थापत्य) या पदावर निव्वळ तात्पुरत्या स्वरुपात पदोन्नती देण्याबाबत विभागीय पदोन्नती समितीने दि. ०६ जानेवारी २०२५ च्या बैठकीत मान्यता दिली. त्याचप्रमाणे नागपूर सुधार प्रन्यासच्या विश्वस्त मंडळाद्वारे तसा संदर्भ क्र. २ येथील ठराव करण्यात आला.

३. यास अनुसरुन सभापती, नागपूर सुधार प्रन्यास यांनी त्यांच्या संदर्भ क्र.१ येथील पत्रान्वये श्री. भांडारकर, कार्यकारी अभियंता (स्थापत्य) यांना (एस-२५) रु.७८८००-२०९२०० या वेतनसंरचनेत अधिक्षक अभियंता (स्थापत्य) या पदावर तात्पुरत्या स्वरुपात पदोन्नती देण्याबाबत प्रस्ताव शासनास सादर केला. सदर प्रस्तावास मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

१. सभापती, नागपूर सुधार प्रन्यास, नागपूर यांच्या अध्यक्षतेखाली गठीत पदोन्नती समितीच्या दि. ०६ जानेवारी २०२५ रोजी झालेल्या बैठकीमध्ये समितीने केलेल्या शिफारशीनुसार, तसेच संदर्भ क्र.२ येथील ठरावाद्वारे मान्यता प्राप्त झालेल्या श्री. प्रशांत मनोहर भांडारकार, कार्यकारी अभियंता (स्थापत्य) यांना "अधीक्षक अभियंता (स्थापत्य)" वेतनश्रेणी (एस-२५ ) रु. ७८८००-२०९२०० या पदावर तात्पुरत्या स्वरुपात पदोन्नती देण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

२. अधिक्षक अभियंता (स्थापत्य) संवर्गातील पदोन्नतीसाठी असलेल्या पदांची बिंदूनामावली तपासून ती सक्षम प्राधिकाऱ्याकडून प्रमाणित करून घेण्यात आली आहे, याची खात्री करून सभापती, नागपूर सुधार प्रन्यास, नागपूर यांनी पदोन्नतीबाबतची पुढील कार्यवाही करावी.

३. श्री. भांडारकर, यांचा आवश्यकतेनुसार ५०/५५ चा आढावा घेण्यात यावा.

४. सदर तात्पुरती पदोन्नती देताना पदोन्नती तपासणी समितीच्या अहवालातील सर्व अटींचे तंतोतंत पालन करण्यात यावे.

५. सदर तात्पुरती पदोन्नती मा.उच्च न्यायालय, मुंबई यांनी रिट याचिका क्र.२७९७/२०१५, दि.०४ ऑगस्ट, २०१७ रोजी दिलेल्या निर्णयाविरुद्ध राज्य शासनाने मा.सर्वोच्च न्यायालयात दाखल केलेल्या विशेष अनुमती याचिका क्र. २८३०६/२०१७ मधील निर्णयाच्या अधिन असेल.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा सांकेतांक २०२५०३२०१९००४२९२२५ असा आहे. सदर शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

VIDYA RAMAPPA HAMPAYYA

Digitally signed by VIDYA RAMAPPA HAMPAYYA
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=URBAN DEVELOPMENT DEPARTMENT,
2.5.4.20=7b40f543d9d95d4cad6707bb7eae1089289d9878b7cb34418f111566e3223ba1, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=A94EF1B631F4673B829AC9ADBEB5B0DDABD086A7544E3FDF47CD7A011FF7EA40, cn=VIDYA RAMAPPA HAMPAYYA
Date: 2025.03.20 19:02:17 +05'30'

**(विद्या हम्पय्या)**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.
२. मा. उप मुख्यमंत्री तथा मंत्री (नगरविकास) यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. मा. उप मुख्यमंत्री तथा मंत्री (वित्त व नियोजन) यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
४. प्रधान सचिव (नवि-२) यांचे विशेष कार्य अधिकारी, मंत्रालय, मुंबई.
५. सभापती, नागपूर सुधार प्रन्यास, नागपूर.
६. निवडनस्ती (नवि-२६).